**आर्थिक वर्ष सन २०१०-११**
**मागणी क्र. बी -७,**
**मुख्य लेखाशिर्ष ३०५१, बंदरे व दिपगृहे**
**(३०५१ ०७६८) अंतर्गत अनुदान वितरण**
**करण्याबाबत.**

**शासन निर्णय**
**गृह विभाग**
**शासन निर्णय पीएलएन ०३१०/ प्र क्र १००/ बंदरे -२,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक ३० मार्च, २०११ .**

**वाचा :**

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे पत्र क्र. ममेबो / मुकाअ/अर्थ-२/ यो. ख.वि.आ./१०७, दिनांक २५ मार्च, २०११.

२) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. पीडीई ०६०६/प्र क्र १२/बंदरे-२, दिनांक १० ऑक्टोबर, २००६.

३) शासन परिपत्रक क्र. वित्त विभाग क्र. अंदाज २०.११/ प्र क्र ३१/ २०११/ अर्थसंकल्प-३, दिनांक ४ मार्च, २०११.

**प्रस्तावना :-**

'बंदरापर्यंत रस्ते / रेल्वे मार्ग बांधणे आणि ब्रेकवॉटर विकास' या प्रयोजनासाठी सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्रमांक बी-७, लेखाशिर्ष ३०५१ - बंदरे व दिपगृहे, १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्यक अनुदान, ०२ लहान बंदरे, (०१) मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान, (०१) (०८) बंदरापर्यंत रस्ते / रेल्वेमार्ग बांधणे आणि ब्रेकवॉटर विकास (राज्य) (योजनांतर्गत) (३०५१ ०७६८), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली रु. १००.०० लक्ष हा निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून रत्नागिरी येथील मिऱ्या जंक्शन ते भगवतीबंदर पर्यंतच्या रस्त्याचे मजबुतीकरण करणे या कामासाठी निधी वितरित करण्याचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांनी उपरोक्त "वाचा" येथील क्र. (१) येथील दि. २५.३.२०११ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

२. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची नवीन कामे व उपकरणे यांच्या संदर्भात खर्च करण्यासाठी वित्तिय अधिकार, उपरोक्त "वाचा" येथील क्र. २ येथील दिनांक १० ऑक्टोबर, २००६ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास प्रदान करण्यात आले आहेत. या वित्तिय अधिकारांच्या मर्यादेत रु.१००.०० लक्ष खर्चाच्या कामास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांनी प्रशासकीय मान्यता द्यावयाची आहे. त्याअनुषंगाने रत्नागिरी येथील मिऱ्या जंक्शन ते भगवती बंदर पर्यंतच्या रस्त्याचे मजबुतीकरण करणे या कामाच्या अंदाजपत्रकास बोर्डाचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी दि. २५.३.२०११ च्या आदेशान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे.

या प्रयोजनासाठी अर्थसंकल्पामध्ये मंजूर झालेले अनुदान महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

रत्नागिरी येथील मिऱ्या जंक्शन ते भगवती बंदर पर्यंतच्या रस्त्याचे मजबुतीकरण करणे या कामासाठी सन २०१०-११ या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पित झालेला रु. १००.०० लक्ष (अक्षरी रुपये एक कोटी फक्त) इतका निधी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रयोजनासाठी उपरोक्त निधीपैकी ९० टक्के निधी, अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) च्या माध्यमातून संगणकाद्वारे वितरीत करण्यात आला आहे.

३. या प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक बी-७, लेखाशिर्ष ३०५१ - बंदरे व दिपगृहे, १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्यक अनुदान, ०२ लहान बंदरे, (०१) मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान, (०१) (०८) बंदरापर्यंत रस्ते / रेल्वेमार्ग बांधणे आणि ब्रेकवॉटर विकास (राज्य) (योजनांतर्गत) (३०५१ ०७६८), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. तसेच सदर खर्च सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. वरील "वाचा" येथील क्र. ३ दि. ४.३.२०११ च्या परिपत्रकातील अटींचे कटाक्षाने पालन करण्याच्या अधिन राहून उपरोक्त तरतूद खर्च करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर अपलोड करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०११०३३०१६०९४५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(प्र. ता. गौड)**
**सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई (५ जादा प्रतींसह)
वित्त विभाग (व्यय-८/ अर्थसंकल्प -११), मंत्रालय, मुंबई-३२
अवर सचिव, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
नियोजन विभाग, (का. १४६२), मंत्रालय, मुंबई - ३२
निवडनस्ती (बंदरे-२)